वरळी दुग्धशाळेच्या आवाराची / कामगार / पर्यवेक्षकीय निवासस्थानांची तसेच वसाहतीची दैनंदिन साफसफाई ठेका देऊन करण्यासाठी वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः दुविआ २०११/प्र.क्र.२१३/पदुम-९,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
तारीख: ०४/०९/२०१४

वाचा

१) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई कार्यालयाचे क्र.आदुवि-१४(१)/वरळी डेअरी वसाहत/स्वच्छता ठेका/२०१४-१५/२१७२, दि.८/५/२०१४ चे पत्र.

प्रस्तावना

वरळी दुग्धशाळे अंतर्गत कर्मचारी/कामगार यांचेकरीता शासकीय निवासस्थाने (पर्यवेक्षीय/कामगार/कर्मचारी वसाहत) आहेत. कारखाने कायदा सन-१९४८नुसार दुग्धशाळा कार्यान्वित असून, दुग्धशाळेत उत्पादन तीन पाळीत घेण्याची व्यवस्था असल्याने त्यानुसार अत्यंत आवश्यक तांत्रिक सेवेतील कर्मचारी/कामगार कार्यरत आहेत. तसेच उत्पादनाशी निगडीत बाब असल्याने, सदर कर्मचारी /कामगार यांना नजिकच्या ठिकाणी शासकीय निवासाची सुविधा असून, पर्यवेक्षकीय ८ इमारती (६४ निवासस्थाने) व कामगार वसाहत (४६८ निवासस्थाने) १६ विंग आहेत. सदर वसाहतीच्या सभोवतालच्या परिसराची व्याप्ती मोठी असून, वसाहत बृहन्मुंबईतील गजबजलेल्या ठिकाणी आहे. वरळी दुग्धशाळेत स्वच्छता विभागात साफसफाईच्या कामाकरीता उपलब्ध असलेले कामगार अपूरे असल्याने, वसाहतीच्या परीसराची साफसफाई स्वच्छता ठेका देऊन राखण्यात येते.

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला मध्ये अशा स्वरुपाचा खर्च भागविण्याचे प्राधिकार प्रशासनिक विभागाला नाहीत. सबब, सदर बाब ही दरवर्षीची नैमित्तीक खर्चाची बाब असल्याने, प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यामध्ये होणारा कालापव्यय टाळण्यासाठी वरील दुग्धशाळेच्या वसाहतीमध्ये साफसफाई निविदा काढून स्वच्छता ठेका देण्यासाठी प्राधिकार प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-दुसरा नुसार वरळी दुग्धशाळेच्या आवाराची/कामगार/पर्यवेक्षकीय निवासस्थानांची तसेच वसाहतीची दैनंदिन साफसफाई स्वच्छता ठेका देऊन करण्यासाठी पुढील प्रमाणे अधिकार प्रदान करण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

| भाग- दुसरा | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र. | नवीन शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम प्राधिकारी | वित्तीय शक्तीची मर्यादा | अटी |
| १ | वरळी दुग्धशाळेच्या आवाराची/कामगार/ पर्यवेक्षकीय निवासस्थानांची तसेच वसाहतीची दैनंदिन साफसफाई ठेका देऊन करणे. | १)प्रशासनिक विभाग | १)वार्षिक रु.४.०० लक्ष | १.अर्थसंकल्पात निधी उपलब्ध असला पाहिजे.<br>२.खर्च काटकसरीने करण्याबाबत संबंधित प्राधिकाऱ्यांनी आवश्यक ती काळजी घ्यावी.<br>३.कार्यपध्दती विषयक नियम आणि वेळोवेळी काढलेल्या आदेशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>४.आवश्यक असल्यास दरपत्रके मागविण्यात यावी.<br>५.योग्य ते सेवा संविदा करार करण्यात यावेत.<br>६.विभागप्रमुखांना त्यांच्या स्वत:च्या कार्यालयातील प्रशासन/लेखाविषयक कार्यभार सांभाळणाऱ्या राजपत्रित अधिकाऱ्याला हे अधिकार पुन:प्रदान करता येतील. |
| | | २) विभाग प्रमुख तथा आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास | २)वार्षिक रु.२.५० लक्ष | |
| | | ३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख तथा महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दुध योजना, वरळी | ३)वार्षिक रु.२.००लक्ष | |

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, भाग-२ अंतर्गत उपरोक्त तक्त्यातील स्तंभ-५ मध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च अपेक्षित असल्यास व विहित अटी पूर्ण होत नसल्यास, अशा प्रस्तावास शासनाच्या वित्त विभागाची वित्तीय मंजुरी आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार प्रदान समितीने दिलेल्या मान्यतेनुसार वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४२/विनियम, दि.७/८/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४१४३७३०२६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.09.04 15:02:48 +05'30'

**(श.मा.साठे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.

२.मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३.मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५.अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६.प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७.सचिव (वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८.सचिव (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

९.सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई

११. उप आयुक्त (प्रशासन), दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.

१२. उप आयुक्त (वित्तीय सल्लागार) दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.

१३. महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दुध योजना, वरळी मुंबई.

१४.सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,

१५.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५. निवड नस्ती.